कामाच्या ठिकाणी महिला कर्मचाऱ्यांच्या लैंगिक छळवणूकीसंदर्भात तक्रारींचे निवारण करण्यासाठी कौशल्य विकास विभागांतर्ग (खुद्द) तक्रार निवारण समितीची स्थापना करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**
**शासन आदेश क्र.मतस-२०१५/प्र.क्र.१५१/प्रशा-१**
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक :- २४/०६/२०१५.

**पहा:-**१) रोजगार व स्वयंरोजगार विभागाचे कार्यालयीन आदेश क्र.मकचौ-२००५/संकीर्ण/प्रशा-१, दि.२१/१२/२०१२.
२) शासन निर्णय महिलाव व बाल विकास विभाग क्र.मकचौ-२०१३/प्र.क्र.६३/मकक, दि.१९/६/२०१४.

## कार्यालयीन आदेश

केंद्र शासनाकडून कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई व निवारण) अधिनियम दि.२३/४/२०१३ व त्यांतर्गत दि.०९/१२/२०१३ रोजी नियम प्रसिद्ध करण्यात आलेले आहेत. त्यानुसार प्रत्येक कार्यालयात अंतर्गत तक्रार निवारण समिती स्थापन करण्याबाबतचा शासन निर्णय दि.१९/६/२०१४ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

२. सदर अधिनियमामधील तरतूदी व शासन निर्णय दि.२१/१२/२०१२ अन्वये या विभागाच्या आस्थापनेवर गठीत करण्यात आलेल्या समितीमधील अध्यक्ष नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त झाल्यामुळे अंतर्गत तक्रार निवारण समिती पुढीलप्रमाणे नव्याने गठीत करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | कर्मचारी/अधिका-यांचे नाव | पदनाम | समितीमधील पदनाम |
|---|---|---|---|
| १ | श्रीमती उ.प्र.महाजन | सहसचिव | अध्यक्ष |
| २ | श्रीमती स.वि.अनगोळकर | अवर सचिव | सदस्य |
| ३ | श्री.आनंद स.रामटेके, | कक्ष अधिकारी | सदस्य |
| ४ | श्रीमती निलीमा चिमोटे | रोखपाल | सदस्य |
| ५ | श्रीमती अनघा सरपोतदार बिल्डींग नं. २, प्लॉट नं.९,पार्ले पुष्प,उत्कर्ष मंडळ हॉल, विलेपार्ले ( इ )मुं-५७ | अशासकीय सदस्य | अशासकीय सदस्य |
| ६ | श्रीमती दिपाली परांजपे | सहायक | सदस्य सचिव |

३. या विभागातील सर्व अधिकारी व कर्मचा-यांना महिला कर्मचाऱ्यांना याद्वारे कळविण्यात येते की, लैंगिक छळासंदर्भात त्यांची कोणतीही तक्रार असल्यास ती अंतर्गत समितीच्या अध्यक्षा किंवा सदस्य सचिव किंवा अंतर्गत तक्रार निवारण समितीच्या नावे सादर करावी.

४. सदर महिला तक्रार निवारण समितीचे कामकाज पुढीलप्रमाणे चालेल :-

अ) केंद्र शासनाने कामाच्या महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई व निवारण) अधिनियम दि.२३/४/२०१३ व त्यांतर्गत दि.०९/१२/२०१३ रोजी नियम प्रसिद्ध केले आहेत. यामधील तरतूदीनुसार महिलांच्या लैंगिक छळवणूकीस आळा घालण्यासाठी व कामाच्या ठिकाणी सुरक्षित वातावरण मिळावे यासाठी आवश्यक उपाय योजना करणे.

ब) विभागाच्या स्तरावर प्राप्त झालेल्या तक्रारींची निर्धारित कालावधीमध्ये छाननी करणे व तक्रारींच्या अनुषंगाने योग्य त्या प्राधिकाऱ्यांकडे पुढील कार्यवाहीसाठी प्रस्ताव सादर करणे.

क) लैंगिक छळवणूकीसारखे प्रकार टाळण्यासाठी जागृती निर्माण करणे तसेच समितीच्या नियतकालीक बैठका घेऊन सुरक्षित वातावरणाच्या निर्मितीबाबत खात्री करणे.

ड) सदर ॲक्टमधील तरतूदीनुसार वार्षिक अहवाल तयार करणे.

सदर कार्यालयीन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२४१२२९११३२०३ असा आहे.हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samridhi V Angolkar

Digitally signed by Samridhi V Angolkar
DN: CN = Samridhi V Angolkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.06.24 12:31:34 +05'30'

**(समृद्धी वि.अनगोळकर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**
संबंधित सर्व अधिकारी व कर्मचारी, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.

**प्रत,**

१) प्रधान सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई -३२.
२) अध्यक्षा, अंतर्गत तक्रार निवारण समिती , कौशल्य विकास व उदयोजकता विभाग, मंत्रालय,मुं.३२
३) उप सचिव, महिला व बाल विकास विभाग, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई -३२.
४) श्रीमती अनघा सरपोतदार, बिल्डींग क्र.२ प्लॉट क्र.९, महंत रोड, उत्कर्ष मंउल हॉल जवळ, विलेपार्ले मुंबई - ४०० ०५७.
५) इंडिया सेंटर फॉर ह्यूमन राईट्स अँड लॉ, मुंबई शहर.
६) कौशल्य विकास व उद्योजकता विभागातील सर्व महिला अधिकारी व कर्मचारी.
७) संबंधित अधिकारी व कर्मचारी यांचे वैयक्तिक नस्ती.
८) निवड नस्ती.